राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत सुळे (ता.आजरा, जि.कोल्हापूर) नळ पाणी पुरवठा योजनेच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शास`न निर्णय क्रमांकः पापुयो-२४१३/प्र.क्र.१०८/पापु-१७

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०७ ऑगस्ट, २०१४

**वाचा**

१) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-११०९/१०४(अ)/पापु-०७ दिनांक १७ मार्च २०१०.
२) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक ०९ ऑक्टोबर २०१३
३) ग्रा योजनांच्या लोकवर्गणीबाबतचा.पु.पा.शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/२२/पापु-०७, दिनांक ०९ जुलै,२०१४
४) ग्रा.पा.पु.योजनांच्या लोकवर्गणीबाबतचा शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/२२/पापु-०७, दिनांक ०९ जुलै,२०१४
५) मु. का. अ. जि.प.कोल्हापूर यांचे पत्र जा.क्र.ग्रापापुवि/नपापु/वशि-७/१५५३/१३, दिनांक ०५ नोव्हेंबर, २०१२

**प्रस्तावना:-**

सुळे (ता.आजरा, जि.कोल्हापूर) नळ पाणी पुरवठा योजनेच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव संदर्भाधीन पत्र क्र. ५ अन्वये शासन मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. सदर योजनेस अधिक्षक अभियंता, भारत निर्माण कक्ष, पुणे यांनी दि. ११ ऑक्टोंबर, २०१३ रोजी तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. ग्रामसभेच्या मागणीनुसार जिल्हा परिषद कोल्हापूर यांनी ४० लिटर दरडोई दरदिवशी क्षमतेची नळ पाणी पुरवठा योजना प्रस्तावित करण्यात आली आहे. सदर योजनेचा दरडोई खर्च हा रु. ७,३३५/- इतका असून, हा खर्च विभागाने संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या निकषाच्या १०० % मर्यादेपेक्षा (रु.४,६५४/-) जास्त आहे. या शासन निर्णयाच्या तरतूदीनुसार १०० % पेक्षा अधिक दरडोई खर्च असणा-या योजनांच्या प्रस्तावांना प्रधान सचिव (वित्त), प्रधान सचिव (नियोजन) व प्रधान सचिव (पा.पु.व स्व.वि.) यांचा समावेश असलेल्या उच्चाधिकार समितीमार्फत मान्यता देण्यात येईल असे निर्देशित केले आहे. तद्नुषंगाने सदर उच्चाधिकार समिती समोर रु.७,३३५/- दरडोई खर्च असलेल्या रु.१,२४,६९,०००/- इतक्या ढोबळ

किंमतीच्या सुळे नळ पाणी पुरवठा योजनेचा प्रस्ताव मान्यतेस्तव सादर करुन वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास शासन मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, दरडोई खर्चाच्या निकषात न बसणा-या प्रस्तावांची छाननी करण्याबाबत शासन निर्णय क्र.२ अन्वये गठित करण्यात आलेली त्रिसदस्यीय उच्चाधिकार समितीची बैठक मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांच्या अध्यक्षतेखाली दि.१६ जुलै,२०१४ रोजी घेण्यात आली. सदर बैठकीत सुळे (ता.आजरा, जि.कोल्हापूर) नळ पाणी पुरवठा योजनेच्या रू. ७,३३५/- इतक्या वाढीव दरडोई खर्च असलेल्या रू. १,२४,६९,०००/- (रूपये एक कोटी चोवीस लाख एकोणसत्तर हजार फक्त) इतक्या ढोबळ किंमतीच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली.

२. संदर्भ क्र. ३च्या शासन निर्णयान्वये ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी लोकवर्गणी पुर्णत: रद्द करण्यात आली आहे.

३. ४० लिटर दरडोई दरदिवशी क्षमतेच्या सुळे नळ पाणी पुरवठा योजनेच्या वाढीव दरडोई खर्चाच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास खालील अटींची पूर्तता करण्याच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे

अ) योजनेची कामे विहीत पध्द्तीने निविदा मागविण्यात येऊन करावीत. जादा किंमतीच्या निविदा स्विकृत करण्यापूर्वी तसेच मंजूर दरापेक्षा जास्त दराने साहित्य (उदा. पाईप्स्) घेण्यापूर्वी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाची परवानगी घ्यावी

ब) योजनेचे काम मंजूर किंमतीत कालबध्द व नियोजनबध्दरित्या पूर्ण करण्यात यावे. योजनेची कामे टप्प्या-टप्प्याने करावीत. योजना योग्य पद्धतीने राबविण्याची संपुर्ण जबाबदारी ग्रामपंचायतीची व कार्यकारी अभियंता,जिल्हा परिषद, ग्रा.पा.पु.वि.,कोल्हापूर यांची राहील.

क) योजना चालविण्यासाठी व देखभाल दुरूस्तीसाठी येणारा खर्च भागविण्यासाठी ग्रामपंचायत सुळे यांनी योग्य ती पाणीपट्टी निश्चित करावी व योजनेची देखभाल दुरूस्ती करावी. त्यासाठी शासनाकडून अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

ड) योजनेमध्ये १००% नळ जोडणी करण्यात यावी.

इ) संपूर्ण गाव हगणदारीमुक्त करण्यात यावे.

ई) कोणत्याही कारणाने खर्चात वाढ झाल्यास शासन अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

फ) सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटींची व राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमातंर्गत ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसंदर्भात शासनाने विहीत केलेल्या प्रचलित मार्गदर्शक सुचनांचा अवलंब करण्यात यावा.

४. या योजनेवर होणारा खर्च जिल्हा परिषदेला प्राप्त राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमातंर्गत केंद्र तथा राज्य निधीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८०७११५८०२८१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AMBEKAR SURESH D

Digitally signed by AMBEKAR SURESH D
DN: CN = AMBEKAR SURESH D, C = IN, S = Maharashtra, O = Govt Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation
Date: 2014.08.07 13:39:29 +05'30'

**(सु.दे. आंबेकर)**
**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर.
२) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर.
३) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
४) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
५) जिल्हाधिकारी, कोल्हापूर.
६) संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पी.एम.टी.बिल्डींग स्वारगेट, पुणे.
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर
८) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९) मा.राज्य मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११) मुख्य अभियंता (ना व ग्रा ), म.जी.प्रा., ठाणे.
१२) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
१३) अधीक्षक अभियंता, भारत निर्माण, समन्वय व संनियंत्रण कक्ष, पुणे
१४) अधीक्षक अभियंता, म.जी.प्रा. ना.व ग्रा. योजना मंडळ, पुणे
१५) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, कोल्हापूर
१६) जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, कोल्हापूर.
१७) मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहाय्यक मंत्रालय, मुंबई.
१८) निवड नस्ती पापु-१७